**सन २०१५-१६ अंतर्गत विभागीय कर्मचारी वर्गाच्या प्रशिक्षणासाठी शासकीय मान्यता प्राप्त प्रशिक्षण संस्थांना प्रशिक्षणार्थी शुल्क अदा करण्यासाठी प्रशिक्षण योजनेअंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :** सहक-१४१५/प्र.क्र.२२५/१२-स
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २ नोव्हेंबर, २०१५

संदर्भ - १) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अंवनि/पु.मा. प्रस्ताव/ले.२४२५०१८३/पावसाळी अधि/२०१५-१६/१५, दि.१४/५/२०१५.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,दि.१७/४/२०१५.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा.५,दि.२४/७/२०१५.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३,दि.१/८/२०१५.
५) शासन निर्णय, स.प.व व.विभाग क्र.पूरक-२०१५/प्र.क्र१०२/२०१५/१७-स, दि.०१.०८.२०१५.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३,दि.६/१०/२०१५.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय उत्पादकता परिषद, नवी दिल्ली, राष्ट्रीय उत्पादकता परिषद, चंदिगड व जयपूर उत्पादकता केंद्र, जयपूर या शासकीय मान्यता प्राप्त प्रशिक्षण संस्थांकडून वेगवेगळया प्रशिक्षणासाठी खात्यातील अधिकाऱ्यांची नामांकने मागविण्यात येतात. हा प्रशिक्षण कालावधी ५ ते ६ दिवसांचा असतो. प्रशिक्षणासाठी प्रति प्रशिक्षणार्थी शुल्क सरासरी रु.४०,०००/- इतके आहे. सहकार खात्यातील १२ अधिकाऱ्यांना प्रशिक्षण देण्याचा प्रस्ताव अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकारी संस्था, सहकार आयुक्त कार्यालय यांनी संदर्भाधीन क्र. १ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे.

**शासन निर्णय :-**

सदर बाब विचारात घेऊन राष्ट्रीय उत्पादकता परिषद, नवी दिल्ली, राष्ट्रीय उत्पादकता परिषद, चंदिगड व जयपूर उत्पादकता केंद्र, जयपूर या शासकीय मान्यता प्राप्त प्रशिक्षण संस्थांकडून वेगवेगळया प्रशिक्षणासाठी सहकार खात्यातील १२ अधिकारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी प्रत्येकी रु.४०,०००/- या प्रमाणे एकूण रु.४,८०,०००/- इतके पुरक अनुदान उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र.५ च्या परिपत्रकान्वये मंजूर करण्यात आले आहे. तथापि वित्त विभागाने त्यांच्या दि.६/१०/२०१५ च्या परिपत्रकान्वये ७०% च्या मर्यादेत पूरक अनुदान वितरीत करण्यास सहमती दिलेली असल्याने मंजूर पुरक अनुदानाच्या ७०% मर्यादेत रु.३,३६,०००/- (रु.तीन लाख छत्तीस हजार फक्त) इतके अनुदान

वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार सदरचे पूरक अनुदान ७०% च्या वितरीत करण्यात यावे.

२. यावर होणारा खर्च मागणी क्र.व्ही-२,२४२५-सहकार,००३-प्रशिक्षण,(०१)(०२)विभागीय कर्मचारी वर्गाचे प्रशिक्षण (२४२५०१८३), १३ कार्यालयीन खर्च (योजनेतर) या शीर्षाखाली चालू आर्थिक वर्ष २०१५-१६ साठी मंजूर असलेल्या पूरक अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरचा निधी वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाद्वारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या दि.२४.०७.२०१५ च्या शासन परिपत्रकात नमूद केल्यानुसार मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% च्या मर्यादेत खर्च झाला आहे.

५. पुरवणी मागणी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आली आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने तसेच शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र८५/ अर्थसंकल्प-३, दि.१७.०४.२०१५ व वित्त विभाग क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/ अर्थसंकल्प-३,दि.६/१०/२०१५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०२१५३२२४५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.11.02 15:36:20 +05'30'

**(सु.मु.धाडवे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. वित्त विभाग (व्यय २ / अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती / का.१२-स